लोक जैवविविधता नोंदवही करीता संदर्भ माहिती पुस्तिका - १

# महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळ

## मनुष्याच्या वापरातील जैवविविधता

# औषधोपयोगी रानभाज्या



Scanned by CamScanner

जैवविविधता कायदा 2002 चे प्रमुख उदिष्ट—जैवविविधतेचे संवर्धन करणे, जैवविविधतेच शाश्वत वापर करणे तसेच जैव संसाधनांचा व त्याबाबतच्या पारंपारिक ज्ञानाच्या व्यावसायिक वापरातू प्राप्त होणाऱ्या लाभात स्थानिकांची समन्यायी भागीदारी सुनिश्चित करणे हे आहे

वरील प्रमाणे उद्दिष्टे साध्य करण्याकरीता जैवविविधता कायदा 2002 ची, परिणामकारक अंमलबजावणी करण्यासाठी राष्ट्रीय स्तरावर राष्ट्रीय जैवविविधता प्राधिकरण आणि राज्य स्तरावर राज्य जैवविविधता मंडळ स्थापित करण्यात आलेले असून, जैवविविधता कायदा 2002 चे कलम 41(1) अन्वये स्थानिक स्वराज्य संस्था स्तरावर जैवविविधता व्यवस्थापन समितींची स्थापना करणे व सदर समितीने त्यांच्या क्षेत्रातील जैवविविधतेच्या संवर्धना बरोबरच जैवविविधतेचा दस्ताऐवज तयार करने आवश्यक आहे .

उपरोक्त प्रमाणे जैवविविधता व्यवस्थापन समितीने तयार करावयाचे दस्ताऐवज यास "लोक जैवविविधता नोंदवही" असे संबोधतात. लोक जैवविविधता नोंदवही लिहितांना सर्वत्र एकसुत्रता राहावी यासाठी राष्ट्रीय जैवविविधता प्राधिकरणाने मार्गदर्शक तत्वे प्रसिध्द केली असून, त्यातील विविध प्रपत्रानुसार लोक जैवविविधता नोंदवही तयार करणे आवश्यक आहे. लोक जैवविविधता नोंदवही मार्गदर्शक तत्वानुसार विहित प्रपत्रात नमुद माहितीच्या अनुषंगाने—स्थानिकांना त्यांच्या क्षेत्रातील उपलब्ध जैवविविधता व त्या बाबतची पारंपारीक माहिती / ज्ञान लिहीणे अभिप्रेत आहे. ही माहिती लिहीतांना अनुसरावयाची पद्धत सुलभ व्हावी म्हणुन मंडळाने विहित प्रपत्रांतील आवश्यक माहितीच्या संदर्भात प्रपत्रनिहाय "संदर्भ माहिती पुस्तिका" ची मालीका प्रकाशीत करण्याचे योजीले आहे.

वरील मालीकेतील पहीली संदभ माहिती पुस्तिका "मनुष्याच्या वापरातील जैवविविधता" या अंतर्गत "औषधोपयोगी रानभाज्या" ही पुस्तिका प्रसिध्द करण्यात येत आहे.

या पुस्तिकेचा संबधीत जैवविविधता व्यवस्थापन समित्यांनी लोक जैवविविधता नोंदवही तयार करतांना उपयोग करण्याचे मंडळाचे वतीने आवाहन करण्यात येत आहे. हि पुस्तिका अद्यावत स्वरूपात पुर्नमुद्रित करण्यात आली आहे.

सदस्य सचिव
तथा
प्रधान मुख्य वनसंरक्षक
महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळ नागपूर

नागपूर
दिनांक : ४/१०/२०१८

स्थानिक नाव : **शतावरी** शास्त्रीय नाव : *Asparagus racemosus* Willd.Var.javanica Baker.

कुळ : Liliaceae प्रकार भुमिस्वरुप /अधिवास : पर्णहीन,काटेरी बहुवर्षायु वेल राज्यभर कोरड्या पानझडी आणि ओलसर मोसमी जंगलात तसेच दक्खन मध्ये सामान्यतः आढळते.



**शतावरी**

स्थानिक स्थिती – पूर्वीची : पूर्वी जंगलात व शेताच्या बांधावर सर्वत्र उपलब्ध.

आताची : आता तुरळक आढळ असून काही प्रमाणात शेतात लागवड करतात.

रोप/बीज मिळण्याचे ठिकाण : फळे लालसर तांबडी झाल्यावर त्यातून काळसर बुळबुळीत बिया प्राप्त होतात. शतावरीचे मूळ लावल्यावर पसरत वाढतात.

येण्याचा मौसम : सप्टेंबर ते ऑक्टोबर

उपयोग/पारंपरिक ज्ञान : कोवळे अंकुर भाजी करण्यासाठी वापरतात तसेच सूप सुद्धा तयार करता येते. मुळे मूत्रवर्धक पौष्टिक आणि आरोग्य पुनःस्थापक आहे.मूळ दुधात उगळून भूकवर्धक म्हणून वापरतात.

विकण्यासाठी : शतावरी घृत नारायण तेल शतावरी कल्प या औषधात वापरतात त्यासाठी मुळांची मोठी मागणी आहे.

स्थानिक नाव : **भारंगी** शास्त्रीय नाव : *Clerodendrum serratum(L)* Moon.

कुळ : Verbenaceae प्रकार भुमिस्वरुप /अधिवास : भारंगी झुडुपे डोंगर उतारावर खुरट्या जंगलात उघड्या जागेवर किंवा मोठ्या झाडयांच्या सावलीत वाढणारी बहुवार्षीक रानभाजी.



**भारंगी**

स्थानिक स्थिती – पूर्वीची : मोठया प्रमाणात आढळ.

आताची : कमी प्रमाणात आढळ.

रोप/बीज मिळण्याचे ठिकाण : पावसाळयाच्या शेवटी उपलब्ध.

येण्याचा मौसम : पावसाळयात फुले व फळे येतात.

उपयोग/पारंपरिक ज्ञान : दमा,घट्ट कफ,सर्दी,खोकला,पोट साफ होण्यासाठी गुणकारी. पाने व फूलाची भाजी करतात.

विकण्यासाठी : ग्रामीण क्षेत्रात विक्री करतात.

स्थानिक नाव : **टाकळा** शास्त्रीय नाव : ***Cassia tora* L.**

कुळ : Caesalpiniaceae प्रकार भुमिस्वरुप /अधिवास : पडीक ओसाड जमिनीवर,शेतात बागा मध्ये जंगलात रस्त्यांच्या कडेने सर्वत्र आढळ.

स्थानिक स्थिती – पूर्वीची : मोठया प्रमाणात आढळ.

आताची : कमी प्रमाणात आढळ.

रोप/बीज मिळण्याचे ठिकाण : शेंगा परिपक्व झाल्यानंतर त्यातून तपकिरी काळसर कठीण कवच असलेल्या बिया सह प्राप्त होतात.

येण्याचा मौसम : बिया डिसेंबर जानेवारीत उपलब्ध.

उपयोग/पारंपरिक ज्ञान : त्वचा रोग,वात व कफ दोषनाशक

विकण्यासाठी : ग्रामीण क्षेत्रात विक्री करतात.



**टाकळा**

स्थानिक नाव : **कुडा** शास्त्रीय नाव : ***Holarrhena pubescens* (Roth) Wall.ex DC**

कुळ : Apocynaceae प्रकार भुमिस्वरुप /अधिवास : जंगलात झाडी झुडपा मध्ये वाढणारी औषधोपयोगी रान भाजी.

स्थानिक स्थिती – पूर्वीची : मोठया प्रमाणात आढळ.

आताची : कमी प्रमाणात आढळ.

रोप/बीज मिळण्याचे ठिकाण : दंडगोलाकार शेंगा मधून करड्या बदामी रंगाच्या बिया मिळतात.

येण्याचा मौसम : जून जुलै मध्ये प्राप्त होतात.

उपयोग/पारंपरिक ज्ञान : मुळाची साल व बिया औषधी उपयोगी असून बिया भुकवर्धक, स्तंभक, त्वचारोगात उपयुक्त, साल, आमांश, कावीळ, रक्तस्तंभक, दंतशूळात उपयोगी, फुलांची भाजी करतात.

विकण्यासाठी : ग्रामीण क्षेत्रात विक्री करतात.



**कुडा**

स्थानिक नाव : **करटोली** शास्त्रीय नाव : *Momordica* dioica Roxb.

कुळ : Cucurbitaceae प्रकार भुमिस्वरुप /अधिवास : करटोलीची वर्षायू वेल कोंकण, मराठवाडा, विदर्भ, पश्चिम घाट ,जंगलात झुळपावर आढळते. वेलींना जमिनीत कंदअसून स्त्री जातीच्या वेलीचे कंद औषधात वापरतात.



**करटोली**

स्थानिक स्थिती – पूर्वीची : पूर्वी जंगलात व शेताच्या बांधावर सर्वत्र उपलब्ध.

आताची : आता तुरळक आढळ असून काही प्रमाणात शेतात लागवड करतात.

रोप/बीज मिळण्याचे ठिकाण : नाजूक काटयाचे आवरण असलेल्या लंबगोलाकार फळाच्या गरात अनेक बिया असतात.

येण्याचा मौसम : जुन जुलै नंतर फळे परीपक्व होतात त्यातून बिया सहज प्राप्त करता येतात.

उपयोग/पारंपरिक ज्ञान : कंद रेचक असून कंदाचे चूर्ण मधुमेह, मुतखडा, विषबाधा, हत्तीरोग, मूळव्याधीत रक्तस्त्राव थांबविण्यास उपयोगी.करटोलीच्या फळाची भाजी करतात.

विकण्यासाठी : ग्रामीण क्षेत्रात फळांची विक्री करतात.

स्थानिक नाव : **चंदन बटवा/डोंगरी पालक** शास्त्रीय नाव : *Atriplex hortensis* L.

कुळ : Chenopodiaceae प्रकार भुमिस्वरुप /अधिवास : वर्षायू मांसल दोन ते तीन फूट वाढणारी रोपवर्गीय भाजी असून ओसाड जमिनिवर आढळते.



**ंदन बटवा /डोंगरी पालक**

स्थानिक स्थिती – पूर्वीची : महाराष्ट्रात "डोंगरी पालक " म्हणून लागवड करण्यात येत होती.

आताची : क्वचितच आढळते.

रोप/बीज मिळण्याचे ठिकाण : फळे गोलाकार चपटी पारदर्शी असून त्यात एक अर्धगोलाकार बी असते.

येण्याचा मौसम : ऑक्टोबर ते फेब्रुवारी या दरम्यान फुले व फळे येतात त्यानंतर बी प्राप्त करता येऊ शकते.

उपयोग/पारंपरिक ज्ञान : पाने पक्षाघात,मज्जातंतूच्या रोगात उपयोगी. बिया जंत पडण्यासाठी साखरे बरोबर देतात. पानाची भाजी खारट,स्वादिष्ट ,बलप्रद, त्रिदोषनाशक व स्नायूवर्धक आहे.

विकण्यासाठी : पावसाळयात अल्पप्रमाणात विक्री करतात.

स्थानिक नाव : **घोळ** शास्त्रीय नाव : ***Portulaca oleracea*** **Linn.**

कुळ : *Portulaceae* प्रकार भुमिस्वरुप /अधिवास : ओलसर व पाणथळ जागेत,शेतात पसरत वाढणारी वर्शायु रान भाजी.

स्थानिक स्थिती – पूर्वीची : सर्वत्र आढळ.

आताची : सर्वत्र आढळ.

रोप/बीज मिळण्याचे ठिकाण : असंख्य लहान बिया वर्षभर उपलब्ध.

येण्याचा मौसम : वर्षभर उपलब्ध.

उपयोग/पारंपरिक ज्ञान : कफ व पित्त दोषनाशक. अपचन,गॅसेस, मुळव्याध, अल्सरवर गुणकारी. पानाची भाजी करतात.

विकण्यासाठी : ग्रामीण क्षेत्रात भाजीची विक्री करतात.



**घोळ**

स्थानिक नाव : **आंबुटी** शास्त्रीय नाव : ***Oxalis corniculata*** **Linn.**

कुळ : Oxalidaceae प्रकार भुमिस्वरुप /अधिवास : राज्यभर सर्वत्र आढळते. खोड नाजूक गोलाकार,पसरत वाढणारी वर्षायू वनस्पती आहे.

स्थानिक स्थिती – पूर्वीची : पावसाळ्यात रस्त्याच्या कडेला हमखास उगवलेली आढळत होती.

आताची : आढळण्याचे प्रमाण कमी झाले.

रोप/बीज मिळण्याचे ठिकाण : बोंड वर्गीय चंचूयुक्त फळातून अंडाकृती करड्या रंगाच्या अनेक बिया प्राप्त होतात.

येण्याचा मौसम : मे – जुन.

उपयोग/पारंपरिक ज्ञान : पाने आंबट उष्ण आणि पचनास हलके व भूक वर्धक आहेत ताज्या पानांची कढी पाचक आहे.

विकण्यासाठी : चांगेरीघृत या औषधीकल्पात पानांचा वापर करतात.



**आंबुटी**

स्थानिक नाव : घेटुळी शास्त्रीय नाव : *Boerhavia diffusa* Linn.

कुळ : Nyctoginaceae प्रकार भुमिस्वरुप/अधिवास : बहुवर्षायू रोपवर्गीय वनस्पती कोरडवाहू जमिनीत,शेताचा बांधावर,रस्त्याचा कडेला,पडिक जमिनीवर सरपटत वाढते.

स्थानिक स्थिती – पूर्वीची : पावसाळ्यात माळरानावर ओलसर जागी वर्षभर आढळून येत होती.

आताची : तुरळक आढळते.

रोप/बीज मिळण्याचे ठिकाण : गदाकृती, बोथट, चिकट ग्रंथीयुक्त फळे वर्षभर असतात. इतर ठिकाणी सहज लावता येते.

येण्याचा मौसम : वर्षभर आढळते.

उपयोग/पारंपरिक ज्ञान : विरेचक,दीपक,मूत्रजनक,कफघ्न,वामक आणि शोथहर आहे.काविळीत पित्त काढण्यासाठी वापरतात. मुळे रातआंधळेपणात उपयुक्त. जलोदरात पानाची भाजी उपयुक्त आहे.

विकण्यासाठी : पूनर्नवा तेल,लेह,गुगुळ,चूर्ण इत्यादी औषधात वापरतात.



घेटुळी

स्थानिक नाव : वायवर्णा शास्त्रीय नाव : *Crateva adansonii* DC.

कुळ : *Capparidaceae* प्रकार भुमिस्वरुप/अधिवास : हे पर्णझडी लहान वृक्ष नदी व नाल्यांच्या काठावर उपलब्ध. ओलसर व सावलीच्या जागी आढळते.

स्थानिक स्थिती – पूर्वीची : पूर्वी जंगलात व शेताच्या बांधावर सर्वत्र

आताची : आता तुरळक आढळ असून काही प्रमाणात शेतात लागवड करतात.

रोप/बीज मिळण्याचे ठिकाण : बोंड वर्गीय चंचूयुक्त फळातून अंडाकृती करड्या रंगाच्या अनेक बिया प्राप्त होतात.

येण्याचा मौसम : मे–जून मध्ये परिपक्व फळातून बिया प्राप्त करता येतात.

उपयोग/पारंपरिक ज्ञान : फळे गोल पांढरी/पिवळी गुळगुळीत असतात, त्यात अनेक बिया असतात. कोवळ्या पानाची भाजी करतात.

विकण्यासाठी : वरुणादी कल्प,क्वाथ व घृत या औषधी तयार करण्यास साल व पानाची मोठी मागणी आहे.



वायवर्णा

स्थानिक नाव : चुका / लहान चिरायत शास्त्रीय नाव : *Rumex vesicarius* Linn.

कुळ : Polygonaceae प्रकार भुमिस्वरुप / अधिवास : हि वर्षायु केशहीन वनस्पती प्रामुख्याने दख्खन मध्ये आढळते.



चुका / लहान चिरायत

स्थानिक स्थिती – पूर्वीची : पूर्वी बागेत भाजी म्हणून लागवड करीत असत

आताची : आता तुरळक आढळते.

रोप / बीज मिळण्याचे ठिकाण : त्रिकोणी लहान फळे साधारण पंखधारी पाकळ्यांनी झाकलेली असतात त्यात तांबूस रंगाच्या एक दोन बिया असतात.

येण्याचा मौसम : फेब्रुवारी एप्रिल मध्ये बिया प्राप्त करता येऊ शकतात.

उपयोग / पारंपरिक ज्ञान : भूक लागत नसल्यास किंवा जेवण जात नसल्यास चुक्याच्या भाजीमुळे जेवण जाण्यास मदत होते. आमांश या विकारात शरीराचे नीट पोषण होण्यासाठी उपयोगी. पाने वांग्याचा भाजीत मिसळून केल्यास अतिशय रुचकर लागते म्हणून चुक्यास "रोचनी" असे म्हणतात.

विकण्यासाठी : चुक्याची भाजी बाजारात विकतात.

स्थानिक नाव : काठेमाठ / तांदूळजा शास्त्रीय नाव : *Amaranthus spinosus* Linn.

कुळ : *Amaranthaceae* प्रकार भुमिस्वरुप / अधिवास : शेतात,पडित जागेवर व कचऱ्याच्या ढिगावर राज्यभर आढळते.



काठेमाठ / तांदूळजा

स्थानिक स्थिती – पूर्वीची : राज्यभर मिळत होती.

आताची : आता कामी प्रमाणात मिळते.

रोप / बीज मिळण्याचे ठिकाण : फळे लहान बोड वर्गीय असून त्यात चकचकीत काळसर गोल आकाराचे दोन ते तीन बिया असतात.

येण्याचा मौसम : सप्टेंबर ते नोव्हेंबर महिन्यात बिया प्राप्त करता येतात.

उपयोग / पारंपरिक ज्ञान : पूर्ण झाड उपयुक्त असून शीतल,संसर्गरक्ष सारक, मूत्रवर्धक, भुक वाढविणारे आहे. परम्यात अत्यंत प्रभावी समजल्या जाते.

विकण्यासाठी : ग्रामीण क्षेत्रात विक्री करतात.

स्थानिक नाव : भोकर  शास्त्रीय नाव : **Cordia dichotoma Forst.f.**

कुळ : *Boraginaceae* प्रकार भुमिस्वरुप/अधिवास : हे सदा पर्णी वृक्ष भारतात कोरड्या पानझडी तसेच ओलसर जंगलात आढळून येते.

स्थानिक स्थिती – पूर्वीची : पूर्वी जंगलात सर्वत्र उपलब्ध.

आताची : आता तुरळक आढळ असून काही प्रमाणात लागवड करतात.

रोप/बीज मिळण्याचे ठिकाण : फळे गोलाकार चकचकीत बोरा एवढी पिकल्यावर पिवळसर रंगाची होत असून त्यात बुळबुळीत चिकट रस असतो व त्यात एक ते चार बिया असतात.



भोकर

उपयोग/पारंपरिक ज्ञान : भोकरी चे साल व फळे उपयोगी असून साल स्तंभक असून गुळण्या साठी वापरतात.चूर्ण खाजेवर व त्वचा रोगावर वापरतात. फळे कृमीनाशक.खोकल्यापासून आराम देणारे. तहान कमी करणे व मूत्र जळजळ यात उपयोगी.भोकराच्या फळाची भाजी व लोणचे करतात.रक्तपित्तात पानाची भाजी उपयोगी आहे.

विकण्यासाठी : ग्रामीण क्षेत्रात फळांची विक्री करतात.

स्थानिक नाव : गुळवेल  शास्त्रीय नाव : ***Tinospora cordifolia* (Wild.)Miers.**

कुळ : *Menispermaceae* प्रकार भुमिस्वरुप/अधिवास : गुळवेलीची बहुवर्षायू वेल महाराष्ट्रात सर्वत्र आढळते खोड बोटा एवढे जाड असून त्यावर पातळ त्वचेसारखी साल असते.

स्थानिक स्थिती – पूर्वीची : पूवी जंगलात मुबलक आढळ होती.

आताची : जंगलात कमी आढळते लागवडीचे प्रमाणात वाढ.

रोप/बीज मिळण्याचे ठिकाण : फळे गोलाकार कठीण कवचाची गुच्छानी येतात पिकल्यावर ती लाल होतात. त्यात खडबडीत कवच असणारी एक बी असते.



गुळवेल

येण्याचा मौसम : नोव्हेंबर ते जून या दरम्यान फुले व फळे येतात. शाकीय प्रजनाने लागवड करता येते.

उपयोग/पारपरिक ज्ञान : गुळवेलीचा खोड कडू ,दीपक, पित्तरस स्त्रवण्यासाठी उत्तेजक. काविळीत उपयोग.हे रक्तवर्धक असून तीळाच्या तेलात मिसळून शरीरास मालिश करण्यास वापरतात.

विकण्यासाठी : गुळवेल सत्व,अमृतारिष्ट.अमृता गुगुळ इत्यादी औषधात उपयोग होत असल्याने विक्री होते.

स्थानिक नाव : मायाळू, बेलबोंडी शास्त्रीय नाव : *Basella alba* Linn.

कुळ : Basellaceae प्रकार भुमिस्वरुप / अधिवास : बहुवर्षायू वेल खेड्यात घरावर चढणारी. दख्खन व इतर भागात लागवड. ही उष्णकटीबंधिय प्रदेशात आढळते.

स्थानिक स्थिती – पूर्वीची : पूर्वी जंगलात, घरावर ,बांधावर सर्वत्र उपलब्ध.

आताची : आता तुरळक आढळ असून काही प्रमाणात लागवड करतात.



मायाळू ,बेलबोंडी

रोप / बीज मिळण्याचे ठिकाण : फळे गोलाकार वाटाण्या एवढी लाल काळसर किवा पांढऱ्या रंगाची असून त्यात एक बी असते.

येण्याचा मौसम : बिया उन्हाळी पिका साठी जानेवारी मार्च मध्ये तर पावसाळी पिकासाठी एप्रिल जून मध्ये गोळा करुन पेरणी करतात.

उपयोग / पारंपरिक ज्ञान : हि वनस्पती तुरट, गोडसर, निद्राकार, कामोतेजक, विरेचक व भूक वर्धक आहे हिचा अंगरस पित्त आल्यास अंगावर चोळतात. या वनस्पतीच्या खोडा पासून निघणारे श्लेष्मल द्रव वारंवार डोके दुखण्या वर प्रसिद्ध उपाय आहे.हिच्या पानाची भाजी शरीरातील दाह व वेदना कमी करते.

विकण्यासाठी : क्वचित विक्री करतात.

स्थानिक नाव : कपाळ फोडी शास्त्रीय नाव : *Cardiospermum halicacabum* Linn.

कुळ : Sapindaceae प्रकार भुमिस्वरुप / अधिवास : ही वेलवर्गीय वनस्पती महाराष्ट्रात सर्वत्र जंगलात,खेडे गावात ,शेतात, कुंपणावर झुडपावरून वाढलेली दिसुन येते.

स्थानिक स्थिती – पूर्वीची : पूर्वी जंगलात व घरावर कुंपणावर ,बांधावर सर्वत्र उपलब्ध.

आताची : आता तुरळक आढळ असून काही प्रमाणात कुंपणावर आढळते.



कपाळ फोडी

रोप / बीज मिळण्याचे ठिकाण : फळे त्रिकोणी फुग्या प्रमाणे हवेने भरलेली असतात.त्यात काळसर रंगाच्या पांढरा ठिपका असलेल्या तीन बिया असतात.

येण्याचा मौसम : ऑक्टोबर ते डिसेंबर या कालावधीत बिया गोळा करून जून ते जुलै मध्ये लागवड.

उपयोग / पारंपरिक ज्ञान : पानाची भाजी आमवातात उत्तम औषध आहे. स्त्रियांची मासिक पाळीनियमित होत नसल्यास भाजी खाल्याने उपयोग होतो. जुनाट खोकला या विकारात हि भाजी उपयुक्त आहे.

विकण्यासाठी : क्वचित विक्री करतात.

स्थानिक नाव : समुद्रशोक शास्त्रीय नाव : ***Argyreia nervosa* (Burm.f.) Boj.**

कुळ : *Convolvulaceae* प्रकार भुमिस्वरुप / अधिवास : मोठे आरोही पांढरे खोड असलेली कोकण व दक्खन मध्ये गावा जवळ आढळते.

स्थानिक स्थिती – पूर्वीची : पूर्वी गावा जवळ मोठया प्रमाणात दिसून येत होती.

आताची : आता आदिवासी बहुल क्षेत्रात घरा पुढील मांडवावर वाढलेली दिसून येते.

रोप / बीज मिळण्याचे ठिकाण : फळे गोलाकार ऑगस्ट सप्टेंबर नंतर बिया प्राप्त करता येऊ शकतात शाकीय प्रजननाने लागवड.

येण्याचा मौसम : ऑगस्ट – सप्टेंबर.

उपयोग / पारंपरिक ज्ञान : स्थानिक लोक कोवळ्या पानाची भाजी करतात मूळ आरोग्य पुनरूस्थापक व पौष्टिक म्हणून वापरतात पाने चर्मरक्तकर आणि जखमा व त्वचा रोगात बाह्ये उपाय म्हणून वापरतात.

विकण्यासाठी : फुलांची विक्री करतात.



समुद्रशोक

स्थानिक नाव : कोयेलारी / कोंडील शास्त्रीय नाव : ***Bauhinia purpurea* L.**

कुळ : *Caesalpiniacece* प्रकार भुमिस्वरुप / अधिवास : हे पानझडीचे साधारण १० फूट उंची पर्यंत वाढणारे वृक्ष.पानझडीच्या जंगलात तसेच घराचा अंगणात लागवड केल्याचे दिसून येते.

स्थानिक स्थिती – पूर्वीची : पूर्वी जंगलात सर्वत्र उपलब्ध.

आताची : आता तुरळक आढळ असून काही प्रमाणात लागवड करतात.

रोप / बीज मिळण्याचे ठिकाण : शेंगा नोव्हेंबर ते डिसेंबर मध्ये परिपक्व होतात.शेंगा झाडावरून तोडून उन्हात वाळवून वठोकळ्याने ठोकून बिया प्राप्त करता येऊ शकतात.

येण्याचा मौसम : एप्रिल ते मे मध्ये लागवड करतात.

उपयोग / पारंपरिक ज्ञान : पाने पौष्टिक असून त्यात लोह व इतर जीवनावश्यक खनिजे भरपूर मात्रेत असतात. साल डायरिया ,मूत्राघातात उपयोगी.स्थानिक आदिवासी कोवळ्या पानाची भाजी आवडीने खातात. मार्च महीण्याच्या शेवटी कोवळी पान येण्यास सुरुवात होते व ती ऑगष्ट महिन्याच्या शेवटपर्यंत उपलब्ध होते.

विकण्यासाठी : क्वचित विक्री करतात.



कोयेलारी / कोंडील

# इतर औषधोपयोगी रानभाज्या

| अ.क्र | स्थानिक नाव | शास्त्रीय नाव | कुळ | उपयोगी भाग |
|---|---|---|---|---|
| १ | हादगा | *Sesbania grandiflora* | Fabaceae | फुल |
| २ | शेवगा | *Moringa oleifera* | Moringaceae | शेंगा, पाने व फुल |
| ३ | गोजिभ | *Elephantopus scaber* | Asteraceae | कोवळी पाने |
| ४ | रानमेथी | *Melilotus indica* | Fabaceae | कोवळी पाने व खोड |
| ५ | आघाडा | *Achyranthes apsera* | Amaranthaceae | कोवळी पाने |
| ६ | काटेकोळसुंदा | *Hygrophila schulli* | Acanthaceae | कोवळी पाने |
| ७ | मोहोर | *Dioscorea pentaphylla* | Dioscoreaceae | कंद, नरफुल |
| ८ | पाथरी | *Launaea procumbens* | Asteraceae | पाने |
| ९ | केना | *Commelina benghalensis* | Commelinaceae | कोवळी पाने |
| १० | दिंडा | *Leea macrophylla* | Leeaceae | कोवळी पाने |
| ११ | मोरशेंड | *Bidens biternata* | Asteraceae | कोवळी पाने |
| १२ | नळीची भाजी | *Ipomoea aquatica* | Convolvulaceae | पाने, देठ, कोवळे खोड |
| १३ | वसु | *Trianthema portulacastrum* | Aizoaceae | पाने,देठ |
| १४ | नाल | *Smithia bigemina* | Fabaceae | देठासहित पाने |
| १५ | कमळकाकडी | *Nelumbo nucifera* | Nelumbonaceae | फुलाचा मधला भाग |
| १६ | चिवळ | *Portulaca quadrifida* | Portulaceae | कोवळी पाने, फांदया |
| १७ | पेंढर | *Tamilnadia uliginosa* | Rubiaceae | कच्चे फळे |
| १८ | शेवळा | *Amorphophallus commutatus* | Araceae | कोवळी पाने, कंद |
| १९ | राजगिरा | *Amaranthus cruentus* | Amaranthaceae | कोवळी पाने |
| २० | आंबाडा | *Spondias pinnata* | Anacardiaceae | हिरवे कच्चे फळे |
| २१ | सुरण | *Amorphophallus paeonifolius* | Araceae | कंद, पाने |
| २२ | अळू | *Colocasia esculenta* | Araceae | पान, देठ व कंद |
| २३ | बांबु | *Bambusa arundinacea* | Poaceae | कोवळया खोडाचे कोंब |

प्रकाशक




महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळ

(महाराष्ट्र शासन)



'जैव विविधता भवन', सिविल लाईन्स नागपूर ४४०००१, दूरध्वनी ०७१२-२५२२९८२/८४

ई-मेल : msbb.ngp@gmail.com संकेत स्थळ : www.maharashtrabiodiversityboard.gov.in

मुद्रक: जनाई एंटरटेनमेंट, नागपूर. फो. ९८८१७५६९७५